आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी आकस्मिक खर्चाच्या
संक्षिप्त देयकाच्या संदर्भात सादर करावयाच्या
तपशीलवार देयकांसोबत संबंधित / आवश्यक उपप्रमाणके
(सब व्हाऊचर्स) महालेखापालांकडे पाठविण्याबाबत -----

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय, क्रमांक : मआख-१०००/प्र.क्र.११/२०००/विनियम,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : २१ जुलै, २०००.

पहा :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : मआख-१०९०/(३)/विनियम, दि. १०.५.१९९०.
२)शासन परिपत्रक, वित्त विभाग,क्रमांक : मआख-१०९६/प्र.क्र.९७/९६/विनियम , दि. १६.११.१९९८.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र , मुंबई यांचे अ. शा. पत्र क्रमांक :
TM/Restructing/Vol.II/१५११, दि. २.२.२०००.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर यांचे अ. शा. पत्र क्रमांक :
TM/GR.II/DC Bills/२९७४, दि. १९.१.२०००.

## शासन निर्णय

संदर्भाधिन दिनांक १० मे १९९० च्या शासन परिपत्रकान्वये आकस्मिक खर्चाच्या देयकावर काढलेल्या रकमेचे समायोजन झाल्याबाबतच्या संदर्भात महालेखापालांकडे सादर करावयाच्या तपशीलवार देयकासोबत उपप्रमाणके (Sub-Vouchers) पाठविण्यात येऊ नयेत अशा सूचना देण्यात आलेल्या आहेत. भारताचे नियंत्रक व महालेखापाल यांनी आता याबाबत असे सुचविले आहे की, आकस्मिक खर्चाच्या देयकावर काढलेल्या रकमांच्या समायोजनाबाबतची तपशीलवार देयके,रक्कम काढल्यापासून एका महिन्यात महालेखापालांकडे पाठवावीत, तसेच तपशीलवार देयकासोबत रू.५००/- व त्यावरील रकमांची उपप्रमाणके पाठवावीत. मात्र प्राप्तकर्त्याकडून घेण्यात आलेल्या मुद्रांकित पावत्या (Payee Stamped Receipt) तपशीलवार देयकासोबत पाठविण्याची आवश्यकता नाही.

२. भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांनी सुचविल्यानुसार आहरण व संवितरण अधिकारी यांनी यापुढे आकस्मिक खर्चाच्या संक्षिप्त देयकाद्वारे काढलेल्या रकमेच्या समायोजनेच्या पुष्ट्यर्थ सादर करावयाची आकस्मिक खर्चाची तपशीलवार देयके संबंधित महालेखापालांच्या कार्यालयाकडे पाठविताना आहरण व संवितरण अधिकाऱ्याने तपशीलवार देयकासोबत रू.५००/- व त्यावरील रकमेची उपप्रमाणके पाठवावीत मात्र प्राप्त कर्त्याकडून घेण्यात आलेल्या मुद्रांकित पावत्या (Payee Stamped Receipt) तपशीलवार देयकांसोबत पाठविण्याची आवश्यकता नाही. तसेच संदर्भाधिन दिनांक १६.११.१९९८ च्या परिपत्रकान्वये, ज्या महिन्यात संक्षिप्त आकस्मिक खर्चाच्या देयकान्वये रक्कम प्राप्त झाली असेल त्यासंबंधीची तपशीलवार देयके पुढील महिन्यांच्या अखेरपर्यंत लेखा परीक्षा अधिकाऱ्याकडे सादर करण्यात यावीत असे आदेश देण्यात आलेले होते. त्यात बदल करून आता असे आदेश देण्यात येत आहेत की, आकस्मिक खर्चाच्या देयकासंबंधिची तपशीलवार देयके रक्कम काढल्यापासून एका महिन्याच्या आत लेखा परिक्षा अधिकाऱ्यांकडे सादर करण्यात यावीत.

३. महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ मधील नियम २६,३४,४० व ५४ तसेच महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड एक मधील नियम ३०४ व ३०६ मध्ये आवश्यक त्या औपचारिक सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

दे. रा. धुरी
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

मर्वा-७८३(९२४००-१९५-८-२०००)

८क्रु.आ.प.

प्रति,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, (W. M. III), महाराष्ट्र, नागपूर.
५. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई ४०० ०५१,
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
१०. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, नवी मुंबई,
११. राज्यपालांचे सचिव,
१२. मुख्यमंत्र्यांचे सचिव,
१३. उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
१४. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
* १५. प्रबंधक, उच्च न्यायालय, (मूळ शाखा), मुंबई.
* १६. प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई,
* १७. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई,
* १८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* १९. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई,
* २०. प्रमुख न्यायाधिश, कुटुंब न्यायालय, नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई ४०० ०५१,
२१. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती.
२२. उप मुख्य लेखा परीक्षक (वरीष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती.
२३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२४. सर्व उप कोषागार अधिकारी,
२५. मंत्रालयाच्या सर्व प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख,
२६. मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभाग,
२७. सहकार व वस्त्रोद्योग विभाग (हाऊसिंग सेल), मंत्रालय, मुंबई:३२.
२८. सर्व विभागीय आयुक्त,
२९. सर्व जिल्हाधिकारी
३०. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
३१. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
३२. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१,
३३. संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११० ००१,
३४. निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग.

---

* पत्राने

एलप - ७८३(१२४००-१९५-८-२०००)